**इतर मागास बहुजन कल्याण विभागांतर्गत प्रथम टप्प्यात विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित ६५ उच्च माध्यमिक आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांच्या शारीरिक वाढ होण्याच्या दृष्टीने आधुनिक खुली व्यायामशाळा पुरविण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक विभशा-२०२४/प्र.क्र.३४/विजाभज-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- ३१ जुलै, २०२४.

**संदर्भ:-**
१. शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग क्रमांक- भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१ डिसेंबर, २०१६.
२. शासन निर्णय, इतर मागासवर्ग, सावशैमाप्र, विजाभज आणि विमाप्र कल्याण विभाग, क्रमांक- विभशा-२०१८/प्र.क्र.४६९/विजाभज-२, दिनांक ०३ फेब्रुवारी, २०२०
३. शासन परिपत्रक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्रमांक- विभशा-२०२१/प्र.क्र.२०१/विजाभज-१, दिनांक १९ ऑक्टोबर, २०२२
४. राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समितीच्या दि.२१ जून,२०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
५. शासन पत्र, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्रमांक- विभशा-२०२४/प्र.क्र.४२/विजाभज-१, दिनांक २६ जून, २०२४
६. संचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांचे पत्र क्रमांक-क्रीयुसे/बहुजन समाजकल्याण/व्यायामशाला/२०२४-२५/का-६/९०४, दिनांक ०४/०७/२०२४
७. संचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांचे पत्र क्रमांक-क्रीयुसे/बहुजन समाजकल्याण/व्यायामशाला/२०२४-२५/का-६/९०४, दिनांक ०६/०७/२०२४
८. राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समितीच्या दि.२२ जुलै,२०२४ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.
९. शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्रमांक- विभशा-२०२४/प्र.क्र.३४/विजाभज-१, दिनांक २९ जुलै, २०२४

**प्रस्तावना:-**

शासन निर्णय, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, संदर्भ क्र.९, दिनांक २९/०७/२०२४ अधिक्रमित करण्यात येत असून खालीलप्रमाणे निर्गमित करण्यात येत आहे.

या विभागामार्फत विजाभज प्रवर्गातील मुलामुलींसाठी १००% अनुदानित तत्वावर निवासी आश्रमशाळा चालविण्यात येतात. यातील काही प्राथमिक आश्रमशाळांना श्रेणीवाढ देऊन माध्यमिक आश्रमशाळा सुरु करण्यात आल्या, तसेच कालांतराने काही माध्यमिक शाळांना श्रेणीवाढ देऊन निवासी उच्च माध्यमिक आश्रमशाळा सुरु करण्यात आल्या. सद्यस्थितीत विभागांतर्गत सुमारे ९७७ प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक आश्रमशाळा कार्यरत आहेत. विद्यार्थ्यांची आर्थिक, सामाजिक व शैक्षणिक प्रगती व्हावी यासाठी

स्वयंसेवी संस्थेमार्फत चालविल्या जाणाऱ्या आश्रमशाळा मोलाचे कार्य करीत आहेत. विजाभज प्रवर्गाच्या मुला-मुलींना इयत्ता १ ली ते १२ वी पर्यंत शिक्षणासह मोफत निवास, भोजन व्यवस्था, आरोग्य सुविधा, क्रिडा सुविधा, शैक्षणिक साहित्य, आंथरुण पांघरुण, भोजनाची भांडी इ. सुविधा आश्रमशाळेमार्फत पुरविण्यात येत आहेत. त्यासाठी शासन संबंधित संस्थांना वेतनेतर अनुदान देते.

**२.** आधुनिक खुल्या व्यायामशाळेच्या माध्यमातून आश्रमशाळेतील विद्यार्थी/ विद्यार्थिनी यांना आश्रमशाळेतील खुल्या जागेचा वापर करून आधुनिक खुली व्यायामशाळा (Open Gym) द्वारे निरोगी जीवनशैली शासनामार्फत प्रदान करता येऊ शकते. ज्यामुळे विद्यार्थी/ विद्यार्थिनी खुल्या आणि नैसर्गिक वातावरणात निर्माण केलेल्या आधुनिक व्यायामशाळेच्या आनंद घेऊन व्यायाम करून स्वस्थ व आरोग्यपूर्ण राहतील व पर्यायाने त्यांच्या शैक्षणिक गुणवत्तेत वाढ होईल. ही बाब विचारात घेता, मा.मंत्री महोदयांनी विजाभज आश्रमशाळांना खुली व्यायामशाळा (Open Gym) पुरविणेबाबत निर्देश दिले आहेत.

**३.** उपरोक्त बाब विचारात घेऊन, इतर मागास बहुजन कल्याण विभागार्तंगत चालविण्यात येणाऱ्या खाजगी अनुदानित विजाभज प्रवर्गाच्या निवासी आश्रमशाळांना खुली व्यायामशाळा (Open Gym) पुरविण्याबाबतचा प्रस्ताव शासन निर्णय उद्योग, उर्जा व कामगार विभाग दि.०१/१२/२०१६ अन्वये शासकीय विभागांनी करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची सुधारित खरेदी नियमपुस्तिकेतील परिच्छेद २.९.२ मध्ये नमूद केल्यानुसार शासन परिपत्रक दि.७/०६/२०२२ अन्वये गठीत राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समितीच्या दि.२१/०६/२०२४ रोजी मा.प्रधान सचिव (इ.मा.ब.क.वि.) यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीत सादर करण्यात आला होता. सदरहू बैठकीत झालेल्या चर्चेनुसार सदर बैठकीत झालेल्या चर्चेत संचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांचेकडून अभिप्राय प्राप्त करुन पुढील कार्यवाही करण्याबाबतचा सर्वानुमते निर्णय घेण्यात आला.

**४.** उपरोक्त निर्णयानुसार, इतर मागास बहुजन कल्याण विभागार्तंगत चालविण्यात येणाऱ्या खाजगी अनुदानित विजाभज आश्रमशाळांमध्ये खुली व्यायामशाळा (Open Gym) बसविण्याच्या अनुषंगाने संचालक, क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांनी उपरोक्त नमूद साहित्यांचे उपयोगितता तसेच मानके/विशिष्ट निकषांबाबत संदर्भ क्र.०६ व ०७ अन्वये अभिप्राय दिलेले आहेत. उपरोक्त नमूद अभिप्राय विचारात घेऊन खुली व्यायामशाळा (Open Gym) यांचे उपयोगिततेबाबत राज्यस्तरीय प्रशासकीय विभाग खरेदी समितीच्या दि.२२/०७/२०२४ रोजी मा.प्रधान सचिव (इ.मा.ब.क.वि.) यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या बैठकीत क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांनी त्यांच्या दिनांक ०४/०७/२०२४ व दिनांक ०६/०७/२०२४ रोजी दिलेल्या अहवालानुसार प्रथमत: १०० इतर मागास बहुजन कल्याण विभागार्तंगत चालविण्यात येणा-या खाजगी अनुदानित विजाभज उच्च माध्यमिक आश्रमशाळांतील विद्यार्थ्यांसाठी खुली व्यायामशाळा (Open Gym) देणेबाबत सर्वानुमते निर्णय घेण्यात आला. त्यानुसार ई-निविदा (Bid) दाखल करण्यासाठी प्रशासकीय मान्यतेचे आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**५.** उपरोक्त निर्णयानुसार व शासन मान्यतेने, इतर मागास बहुजन कल्याण विभागार्तंगत चालविण्यात येणाऱ्या विजाभज खाजगी अनुदानित आश्रमशाळांमध्ये अत्याधुनिक खुली व्यायामशाळा (Open Gym) पुरविण्याची आवश्यकता विचारात घेता, प्रथम टप्प्यात ६५ इतर मागास बहुजन कल्याण विभागार्तंगत चालविण्यात येणा-या खाजगी अनुदानित विजाभज उच्च माध्यमिक आश्रमशाळांतील विद्यार्थ्यांसाठी खुली व्यायामशाळा (Open Gym) देण्याच्या अनुषंगाने ई-निविदा (Bid) दाखल करण्यासाठी प्रशासकीय मान्यतेचे आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

इतर मागास बहुजन कल्याण विभागातील प्रथमत: खुली व्यायामशाळेसाठी (Open Gym) आवश्यक असलेले मैदान/जागा उपलब्ध असलेल्या ६५ विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित उच्च माध्यमिक निवासी आश्रमशाळांतील विद्यार्थ्यांसाठी खुली व्यायामशाळा (Open Gym) पुरविण्यासाठी खरेदी करण्यास एकुण रु.९.३४ कोटी (अक्षरी नऊ कोटी चौतीस लक्ष फक्त) (सर्व खर्च व सर्व करांसह) इतक्या अंदाजित रकमेच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**२.** विभागार्तंगत विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित ६५ उच्च माध्यमिक निवासी आश्रमशाळांतील विद्यार्थ्यांसाठी खुली व्यायामशाळा (Open Gym) खरेदी संदर्भात निकष (Specifications) हे राज्यस्तरीय खरेदी समितीच्या बैठकीत मान्य केल्यानुसार उच्च दर्जाचे असतील.

**३.** प्रस्तुत खुली व्यायामशाळा ही क्रीडा व तांत्रिक तज्ञांद्वारे अंतिम करण्यात आलेले तांत्रिक विर्निदेशाप्रमाणे राज्यातील विजाभज प्रवर्गाच्या आश्रमशाळांना उपलब्ध करुन द्यावे.

**४.** राज्यातील विजाभज प्रवर्गाच्या खाजगी अनुदानित ६५ उच्च माध्यमिक निवासी आश्रमशाळांत परिसरात बसविण्यात येणाऱ्या खुली व्यायामशाळा (Open Gym) या साहित्याचे संपूर्ण मालकी हक्क शासनाच्या इतर मागास बहुजन कल्याण विभागाकडे राहतील. संबंधित आश्रमशाळेचे मुख्याध्यापक उपरोक्त नमूद साहित्य ही शासकीय मालमत्ता समजून त्याची देखभाल करतील.

**५.** विजाभज प्रवर्गाच्या निवासी आश्रमशाळेच्या परिसरात अत्याधुनिक खुली व्यायामशाळा (Open Gym) बसविण्याकरीता जागा उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी संबंधित आश्रमशाळेचे संस्थाचालक व मुख्याध्यापकाची राहील.

**६.** आश्रमशाळांमध्ये बसवावयाच्या अत्याधुनिक खुली व्यायामशाळेची (Open Gym) खरेदी प्रक्रीया खालीलप्रमाणे राबविण्यात येईल :-

१) राज्यातील ६५ विजाभज प्रवर्गाच्या आश्रमशाळांतील विद्यार्थ्यांसाठी खुली व्यायामशाळा (Open Gym) पुरविण्याच्या अनुषंगाने क्रीडा साहित्याच्या खरेदीसाठी शासन निर्णय, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१/१२/२०१६ व तद्नंतर त्यानुषंगाने निर्गमित करण्यात आलेल्या शासन निर्णय /नियम / अधिसूचना /परिपत्रकामधील सर्व नियमावली, विहीत अटी, शर्तीच्या अधीन राहून, केंद्रीय दक्षता आयोग (Central Vigilance Commission) यांची मार्गदर्शक तत्वे तसेच प्रशासकीय खरेदी समितीने विहीत खरेदी नियमावलींचे पालन करुन ई-निविदा प्रक्रीया राबवून खरेदी प्रक्रीया पुर्ण करण्यात यावी.

२) प्रस्तुत ई-निविदेतील न्युनतम दरधारक (L-१) यांना उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या दि. ०१ डिसेंबर, २०१६ रोजीच्या शासन निर्णयासोबतच्या "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपद्धतीची नियमपुस्तिकेत विहीत केलेली कार्यपध्दती तसेच शासनाचे प्रचलित नियम व Central Vigilance Commission (CVC) यांची मार्गदर्शक तत्वे विचारात घेऊन निविदा अंतिम कराव्यात.

३) बंच बिड असल्याने निविदाकारांनी एकच किंमत सांगणे अपेक्षित आहे. सदर किमतीमध्ये DESIGN, SUPPLY (incl.transportation), INSTALLATION, व GST इत्यादी सर्व बाबींचा समावेश असेल, निविदाकार बिडमध्ये वरील बाबींसाठी वेगवेगळ्या किंमती दर्शविणार असल्यास संबंधित बिड विचारात घेतले जाणार नाही.

७. सदर खरेदीबाबतचा खर्च "मागणी क्र. झेडजी-३, प्रधानशीर्ष-२२२५ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागास वर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण, २७७-शिक्षण, (०१) विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागास वर्ग व विशेष मागास प्रवर्ग यांचे कल्याण, (०१) (०२) अशासकीय संस्थाद्वारे विमुक्त जाती भटक्या जमातीच्या विद्यार्थ्यांसाठी चालविण्यात येणाऱ्या निवासी आश्रमशाळांतील वसतीगृहातील सुविधा वाढविणे (कार्यक्रम) (२२२५ई८७५), २१-पुरवठा व सामग्री" या लेखाशिर्षातर्गत सन २०२४-२५ या वर्षात उपलब्ध होणाऱ्या तरतूदीमधून भागविण्यात येईल.

८. हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८ भाग पहिला, उपविभाग ०२ मधील अनुक्रमाक-३ नियम क्र.०७ नुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक-अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१/०४/२०२४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२४०७३११७०४२०६८३४ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KAILAS TARACHAND SALUNKE

Digitally signed by KAILAS TARACHAND SALUNKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=OTHER BACKWARD BAHUJAN WELFARE DEPARTMENT, 2.5.4.20=2251a03d4696f35feb94e0a8547536fa68882bdecaaba93cee29502d225f6286, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=35C845457FD4B891124529DBD2192A0E21273AD7339A5CA3B170A0E91352CED7, cn=KAILAS TARACHAND SALUNKE
Date: 2024.07.31 17:19:14 +05'30'

**(कैलास साळुंके)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
३) मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
४) मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
५) मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६) मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७) मा.मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

८) मा.उप मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
९) संचालक, इतर मागास बहुजन कल्याण संचालनालय, पुणे.
१०) मा.मंत्री, इतर मागास बहुजन कल्याण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
११) प्रधान सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१२) महालेखापाल (लेखा परिक्षा),/ (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
१३) महालेखापाल (लेखा परिक्षा),/ (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१४)उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग (प्रादेशिक) (सर्व)
१५)सहायक संचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग (सर्व)
१६) लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा व निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१७) उपसचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) उपसचिव (का-१४१३) नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) उपसचिव (व्यय-१४) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१) निवडनस्ती (विजाभज-१).